**श्री.शिवाजी कारभारी आमले, प्रकल्प संचालक (आत्मा), जळगाव यांची उद्यान अधिक्षक, नाशिक महानगरपालिका या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आकृवि-१४१८/प्र.क्र.११४/१५-अे**
मंत्रालय विस्तार इमारत,
मंत्रालय, मुंबई-३२.
तारीख : ९ जुलै, २०१८.

**शासन निर्णय** :-

श्री.शिवाजी कारभारी आमले, प्रकल्प संचालक (आत्मा), जळगाव यांच्या सेवा उद्यान अधिक्षक, नाशिक महानगरपालिका या पदावर प्रतिनियुक्तीने दोन वर्षाच्या कालावधीसाठी सक्षम प्राधिकरणाच्या मंजूरीने खालील अटींच्या अधीन राहून सुपूर्द करण्यात येत आहेत.

अ) श्री.शिवाजी कारभारी आमले, ज्या तारखेला शासकीय सेवेतील पदाचा कार्यभार सुपूर्द करतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ती सेवा ज्या तारखेला श्री.आमले, आपल्या शासकीय पदाचा कार्यभार पुन्हा स्वीकारतील, त्या तारखेला समाप्त होईल.

आ) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनिुयक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन / सक्षम प्राधिकारी राखून ठेवील.

इ) जर त्यांची सेवा आयुक्त, नाशिक महानगरपालिका यांना आवश्यक वाटली नाही तर श्री.आमले यांना मुळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा त्यांना राहील. मात्र, याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी त्यांनी शासनाला / सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे;

आणि

ई) त्यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी ३ महिन्यांची लेखी नोटीस शासनाला / सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

२. श्री.आमले यांनी आपल्या पदाचा कार्यभार समकक्ष / नजिकच्या कनिष्ठ अधिकाऱ्याकडे सोपवून प्रतिनियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रूजू व्हावे व तसा अहवाल आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

३. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदरचे आदेश तात्काळ अंमलात येतील हे कृपया पहावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७२३१५१७०३११०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sugriv Sambhaji Dhapate

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, cn=Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2018.07.23 15:19:34 +05'30'

**(सु.सं.धपाटे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५प्रती)

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.मंत्री (कृषि) / मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त, नाशिक महानगरपालिका, नाशिक.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा) ½, महाराष्ट्र मुंबई/ नागपूर.
५. संचालक (आत्मा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (द्वारा आयुक्त (कृषि) पुणे)
६. संबंधित विभागीय आयुक्ता (द्वारा आयुक्त (कृषि) पुणे)
७. संबंधित विभागीय कृषि सह संचालक (द्वारा आयुक्त (कृषि) पुणे)
८. कृषि सह संचालक, आस्थापना, कृषि आयुक्तालय, पुणे.
९. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी (द्वारा आयुक्त (कृषि) पुणे)
१०. संबंधित अधिकारी (द्वारा आयुक्त (कृषि) पुणे)
११. मा.अ.मु.स. (कृषि) यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती /१५-अे.